**किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात येणारा धान व त्यापासून तयार होणाऱ्या तांदळाची (CMR) वाहतुक करण्याबाबतचा सर्वंकष आराखडा तयार करण्याकरिता समिती स्थापन करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहद-२०२०/ प्र.क्र. ०४/ नापु २९.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० जानेवारी, २०२०.

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय क्रमांक : खरेदी-१११५/प्र.क्र.१७/नापु-२९, दि. १४ जानेवारी, २०१६.
२) शासन शुद्धिपत्रक क्रमांक : खरेदी-१०१४/६८/प्र.क्र.१७/नापु-२९, दि. ०३ नोव्हेंबर, २०१७.
३) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २६१९/प्र.क्र.८४/ना.पु.२९, दिनांक १६ ऑगस्ट, २०१९.
४) शासन शुद्धिपत्रक क्रमांकः संकीर्ण - २६१९/प्र.क्र.८४/ना.पु.२९ दिनांक : १६ ऑक्टोबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजना ही केंद्र शासनाची योजना असून शेतकऱ्यांना हमी भावापेक्षा कमी किंमतीने ( डिस्ट्रेस सेल ) धान्य विकावे लागू नये, म्हणून ही योजना राबविण्यात येते. याअंतर्गत "धान" या धान्यासाठी राज्यात "विकेंद्रीत खरेदी योजना" (DCPS) सन २०१६-१७ पासून संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ नुसार लागू करण्यात आली आहे. या योजनेमध्ये, राज्य शासनाने नियुक्त केलेल्या अभिकर्ता संस्थांमार्फत (बिगर आदिवासी क्षेत्रात महाराष्ट्र स्टेट को-ऑप. मार्केटिंग फेडरेशन, मुंबई व आदिवासी क्षेत्रात, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक ) राज्यात एफ.ए.क्यु. (Fair average quality) दर्जाच्या धान व भरडधान्याची खरेदी करण्यात येते.

वरील योजनेंतर्गत खरेदी केलेल्या धानाची भरडाई अभिकर्ता संस्थांमार्फत मिलर्सकडून करुन घेऊन प्राप्त होणारा सी.एम.आर. (Custom milled rice) ( कच्चा तांदूळ ) शासकीय गोदामांत जमा करण्यात येतो. राज्यातील गोंदिया, भंडारा, गडचिरोली, चंद्रपूर व नागपूर या जिल्ह्यांत मोठ्या प्रमाणावर धान उत्पादन होत असून त्यापासून तयार होणारा तांदुळ (CMR) हा त्या जिल्ह्यांच्या गरजेपेक्षा जास्त असल्याने तेथील CMR ची वाहतूक इतर जिल्ह्यांमध्ये करणे आवश्यक ठरते. तसेच खरेदीच्या प्रमाणात अभिकर्ता संस्थांच्या अधिनस्त खरेदी केंद्रांची ठिकाणे, जिल्ह्याचे भौगोलिक स्वरुप या अनुषंगाने धान वाहतूकीस येणारा खर्च वाढतो.

हंगाम २०१६-१७ ते २०१८-१९ मधील धान व सीएमआर वाहतुकीचा वाढीव खर्च विभागाकडे उपलब्ध असलेल्या पतमर्यादेतून करण्यास व त्याच्या प्रतिपूर्तीकरिता वाढीव खर्चाएवढे सहायक अनुदान देण्यास तसेच त्या वाढीव खर्चाकरिता दरवर्षी सहायक अनुदान मिळणेबाबत अर्थसंकल्पिय तरतूद करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव या विभागाकडून वित्त विभागास सादर करण्यात आला असता, सदर प्रस्तावास वित्त विभागाने किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान / सीएमआर वाहतुकीकरिता सर्वंकष आराखडा तयार करणे, प्रत्येक जिल्ह्यातील धान व CMR चा साठा, आवश्यक व किमान खर्चात वाहतुक होईल या दृष्टीने वाटपाचा आराखडा तयार करणे याकरिता राज्यस्तरीय समिती स्थापन करण्याच्या अधीन राहून मान्यता दिली आहे. सबब, त्यानुसार सदर समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत खरेदी करण्यात येणाऱ्या धान व त्यापासून तयार होणाऱ्या तांदळाची (CMR) वाहतुक करण्याबाबतचा सर्वंकष आराखडा तयार करण्याकरिता समिती स्थापन करण्याबाबत खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | --अध्यक्ष |
| जनरल मॅनेजर, भारतीय अन्न महामंडळ | -- सदस्य |
| सह सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | -- सदस्य |
| सह सचिव (व्यय१०), वित्त विभाग | -- सदस्य |
| गृह (परिवहन विभागाचे ) सह परिवहन आयुक्त | -- सदस्य |
| वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | -- सदस्य |
| अवर सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | -- सदस्य सचिव. |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-

**“वाहतूकीचा सर्वंकष आराखडा” तयार करणे** :-

समितीने प्रत्येक जिल्ह्यातील धान/ सीएमआरची वाहतूक करतांना संबंधित जिल्ह्यातील धान्यसाठा, संबंधित जिल्ह्याची लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गतची आवश्यकता लक्षात घेऊन किमान खर्चात वाहतूक होईल याद्दष्टीने धान्य वाटपासाठी करावयाच्या वाहतुकीचा आराखडा तयार करावा व त्यास शासनाची मान्यता घ्यावी.

३. समितीच्या बैठका आवश्यकतेनुसार घेण्यात येतील.

४. उपरोक्त समितीमध्ये किंवा तिच्या कार्यकक्षेमध्ये कोणत्याही प्रकारचे बदल करावयाचे झाल्यास, विभागामार्फत असे बदल करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७२९/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००११०१५४०४७७३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food and Civil Supply, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, serialNumber=ae91c22a99adbafeb91e1127b17cef54d9c48672dc90ac9562ba7f619961cbbb, cn=Satish Shridhar Supe
Date: 2020.01.10 15:24:29 +05'30'

**(सतिश सुपे)**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.

३. मा. मंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
४. मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव.
५. मा. मंत्री, पणन यांचे खाजगी सचिव.
६. मा. मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव.
७. मा. विरोधी पक्ष नेते (विधानसभा, विधानपरिषद)
८. मा. राज्यमंत्री, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण, यांचे खाजगी सचिव.
९. मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, (वित्त) महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१३. अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. अपर मुख्य सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई.
१५. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशन लि., कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट,मुंबई- ४०० ००९.
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, आदिवासी विकास भवन, २ रा माळा, राम गणेश गडकरी चौक, जुना आग्रा रोड,नाशिक-२,
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा(गो/वा),मुंबई,
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व उप आयुक्त (पुरवठा),
२३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२४. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी,
२५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
२६. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई.
२७. सहसचिव /सर्व उप सचिव/अवर सचिव/सर्व अधिकारी,अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई,
२८. सर व्यवस्थापक,(महा.) भारतीय अन्न महामंडळ,५ वा माळा, राजेंद्र नगर, दत्तपाडा रोड, बोरीवली पूर्व मुंबई-४०० ०६६.
२९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती ),
३०. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधान भवन, मुंबई. (१०प्रती)
३१. मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, ( प्रत्येकी ५ प्रती ),
३२. सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
३३. निवड नस्ती (नापु-२९).